दादा भगवान प्ररूपित

# संघर्ष टाळा



कोणाशीही संघर्ष झाला तर ती आपल्या अज्ञानतेची निशाणी आहे.

Marathi

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 1000 सप्टेंबर 2007
**रीप्रिंट** : 17000 फेब्रुवारी 2009 ते ऑगस्ट 2015
**नयी रीप्रिंट** : 5000 जुलै 2017

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 10 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-93-86289-91-9

Printed in India

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं
नमो सिद्धाणं
नमो आयरियाणं
नमो उवज्झायाणं
नमो लोए सव्वसाहूणं
एसो पंच नमुक्कारो
सव्व पावप्पणासणो
मंगलाणं च सव्वेसिं
पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥
ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥
ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥
जय सच्चिदानंद





# दादा भगवान कोण?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूंना सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

❖❖❖❖❖

# संपादकीय

'संघर्ष टाळा' हे एकच सूत्र जर जीवनात सहजासहजी उतरले, तर त्याचा संसार तर सुंदर होईलच, पण मोक्षसुद्धा अगदी सहज साध्य होईल! हे निर्विवाद वाक्य आहे!

अक्रम विज्ञानी पूज्य दादाश्रींनी दिलेल्या ह्या सूत्राला आत्मसात् करून कितीतरी लोक तरून गेले. त्यांचे जीवन सुख-शांतीमय झाले आणि ते मोक्षमार्गाला लागले! ह्यासाठी प्रत्येकाने केवळ एक दृढ निश्चय करायचा आहे की 'मला कोणासोबतही संघर्ष (वादविवाद) करायचा नाही. समोरच्या व्यक्तीने संघर्ष केला तरी पण मला मात्र कसेही करून संघर्षात पडायचे नाही. बस, एवढाच जरी कोणी निश्चय केला तर त्याला नैसर्गिक रीत्या आतूनच उपाय सुचेल व संघर्ष टळेल!

रात्री अंधारात खोलीतून बाहेर जायचे असेल आणि समोर भिंत आली, तर आपण काय करू? भिंतीला लाथ मारून म्हणू की 'तू मध्ये का आलीस? सरक इथून, हे माझे घर आहे?' तेव्हा तर आपण कसे शहाणे होऊन हाताने दार शोधत शोधत बाहेर पडतो, हो की नाही? कारण तिथे लक्षात येते की इथे जर आपण आडमुठेपणा केला तर त्या भिंतीवर आपले डोके आपटेल व फुटेल!

चिंचोळ्या गल्लीतून राजा जात असेल आणि समोरून भला मोठा सांड धावत येत असेल, तेव्हा राजा त्या सांडाला 'तू बाजूला सरक, हे माझे राज्य आहे, ही माझी गल्ली आहे, मला जाऊ दे' असे म्हणेल का? मग तो सांड काय म्हणेल, 'तू राजा, तर मी महाराजा! ये मग!' अशा वेळेस भल्याभल्या राजाला सुद्धा तिथून सावकाश सरकून, कट्ट्यावर चढावे लागेल. का? तर संघर्ष टाळण्यासाठी.

ह्या साध्या-साध्या गोष्टीवरून असे लक्षात येते की जे कोणी आपल्याशी वाद घालायला येतात ते भिंतीसारखे आणि सांडासारखेच आहेत. म्हणून जर आपल्याला संघर्ष टाळायचा असेल तर शहाण्यासारखे बाजूला सरकून जावे. जर कुठेही संघर्ष समोर आला तर तो टाळा. यामुळे आपले जीवन क्लेशरहित होईल आणि मोक्ष प्राप्ती होईल.

**-डॉ. नीरूबहन अमीन**

# संघर्ष टाळा

## नका पडू संघर्षात

'कोणाशीही संघर्ष करू नका आणि संघर्ष टाळा.' आमच्या ह्या एका वाक्याची जर आराधना कराल तर थेट मोक्षाला पोहोचाल. तुमची भक्ती आणि आमचे वचनबळ, सर्वच काम करून देईल. तुमची तयारी पाहिजे. आमचे हे एकच वाक्य जर कोणी अमलात आणले तर तो मोक्षाला जाईल. अरे, आमचा एक जरी शब्द 'जसाच्या तसा' पूर्णपणे गळी उतरवाल, तरीसुद्धा मोक्ष हाती येईल, असे आहे! परंतु त्यास 'जसेच्या तसे' गळी उतरवावे.

आमचा एक शब्द, एक दिवस जरी पाळला तरी आश्चर्यकारक शक्ती उत्पन्न होईल! आत एवढी अपार शक्ती आहे की कोणी संघर्ष (वादविवाद, भांडण, विसंवाद) करायला आले, तरी तो टाळता येईल. जो जाणून-बुजून दरीत पडण्याच्या तयारीत आहे, अशासोबत वादविवाद करत बसायचे का? अशी व्यक्ती स्वत: तर कधी मोक्षाला जाणार नाही, परंतु आपल्यालाही स्वत:जवळ बसवून ठेवेल. अरे! हे आपल्याला कसे परवडेल? जर तुला मोक्षालाच जायचे आहे, तर अशा लोकांबरोबर जास्त शहाणपणा करण्यात काही अर्थ नाही. सर्व बाजूंनी, चारी दिशांनी स्वत:ला व्यवस्थित सांभाळायचे. अन्यथा तुला जरी या जंजाळातून सुटायचे असेल तरी पण हे जग तुम्हाला सुटू देणार नाही. म्हणून घर्षण न करता सुरळीतपणे बाहेर निघून जायचे आहे. अरे, आम्ही तर इथपर्यंत सांगतो की, तुझे धोतर काट्यात अडकले असेल आणि जर तुझी मोक्षाची

गाडी सुटत असेल, तर ते धोतर सोडवत बसू नकोस! धोतर सोडून पळून जा. अरे! एक क्षणसुद्धा कोणत्याही अवस्थेत बसून राहण्यासारखे नाही. तिथे मग इतरांची गोष्टच कशाला करायची? जिथे तू चिकटलास तिथे तू स्वरूपाला विसरलास.

चुकून जरी तू कोणत्याही वादात अडकलास, तर लगेच त्याचे समाधान करून टाक. त्या वादविवादातून घर्षणाची ठिणगी उडू न देता सहजपणे तिथून निघून जा.

## ट्रॅफिकच्या नियमांमुळे संघर्ष टळतात

जसे आपण रस्त्यावरून काळजीपूर्वक चालत असतो ना! मग समोरचा माणूस कितीही वाईट असो, आणि त्याने आपल्याला धडक दिली आणि नुकसान केले, तर गोष्ट वेगळी आहे, परंतु आपला हेतू कुणाचे नुकसान करण्याचा नसावा. आपण जर त्याचे नुकसान करायला गेलो, तर आपलेही नुकसान होईल. प्रत्येक संघर्षमय प्रसंगात नेहमीच दोघांचेही नुकसान होते. तुम्ही समोरच्या व्यक्तीला दुःख दिले, तर त्याचक्षणी आपोआप तुम्हालाही दुःख झाल्याशिवाय राहणारच नाही. हा संघर्ष आहे. म्हणून मी हे उदाहरण दिले की रस्त्यावरील वाहतूकीचा नियम काय आहे की धडक दिली तर तुम्ही मरून जाल. धडक देण्यात धोका आहे, म्हणून कोणालाही धडक देऊ नये. त्याच प्रकारे ह्या व्यवहारिक कार्यातसुद्धा संघर्ष करू नका. संघर्ष करण्यात नेहमीच धोका आहे. संघर्ष तर कधी तरीच होतो. महिन्यातून दोनशे वेळा संघर्ष होतो का? महिन्यातून असे प्रसंग किती वेळा घडतात?

**प्रश्नकर्ता :** कधी तरीच! दोन-चार वेळा.

**दादाश्री :** हं, म्हणजे आपण तेवढेच सावरून घ्यावे. माझे असे म्हणणे आहे की आपण कशासाठी बिघडवायचे? प्रसंग बिघडविणे हे आपल्याला शोभत नाही. रस्त्यावर सर्वच वाहतुकीच्या नियमाप्रमाणे

चालतात, तेथे आपल्या मर्जीनुसार कोणी चालत नाही ना? आणि इथे व्यवहारात मात्र स्वतःच्या मर्जीप्रमाणे चालणार! का? इथे काही, नियम-कायदे नाहीत? रस्त्यावर तर कधीच अडचण येत नाही, तिथे किती छान वाहतुकीची व्यवस्था केलेली आहे! तुम्ही जर त्या नियमांना नीट समजून चालाल, तर कधीही अडचण येणार नाही. अर्थात हे नियम समजण्यात चूक होत आहे. नियम समजावणारा समजूतदार असला पाहिजे.

वाहतुकीचे नियम पाळण्याचा तुम्ही निश्चय केला आहे म्हणून किती चांगल्या प्रकारे नियम पाळले जातात! तिथे असा अहंकार का जागृत होत नाही की, 'ते काहीही म्हणून देत, पण मी तर असेच करणार.' कारण वाहतुकीचे नियम स्थूल आहेत म्हणून त्याला बुद्धीने बरोबर समजते, की माझा हात कापला जाईल, मी लगेच मरेन. त्याच प्रकारे संघर्ष केल्याने मी मरून जाईन, या परिणामांची त्याला जाणीव नसते. इथे तर बुद्धी पोहचू शकत नाही. ही सूक्ष्म गोष्ट आहे. याचे नुकसानही सूक्ष्म प्रकारे असते.

## प्रथमच प्रकाशित केले हे सूत्र!

एका व्यक्तीला १९५१ साली हे एक सूत्र दिले होते. तो मला संसार पार करण्याचा मार्ग विचारत होता. मी त्याला 'संघर्ष टाळ' असे म्हटले होते आणि अशा प्रकारे त्याला समजावलेही होते.

त्याचे असे झाले की मी शास्त्राचे पुस्तक वाचत होतो, तेव्हा तो माझ्याजवळ आला आणि म्हणाला, 'दादाजी, मला काही तरी ज्ञान द्या.' तो माझ्याकडे नोकरी करत होता. तेव्हा मी त्याला म्हटले 'तू तर सर्वांसोबत भांडून येतोस, मारामारी करतोस, मग तुला काय ज्ञान द्यायचे?' म्हणजे तो रेल्वेत सुद्धा मारहाण करायचा, तसे तर पैशांची उधळपट्टी करायचा पण रेल्वेला कायदेशीर भरायचे पैसे तो भरत नव्हता, आणि

वरून भांडण करायचा. हे सर्व मला माहीत होते. म्हणून मी त्याला म्हटले, 'तुला ज्ञान शिकवून काय फायदा? तू तर सगळ्यांशीच भांडतोस!' तेव्हा तो म्हणाला, 'दादाजी, आपण सगळ्यांना जे ज्ञान शिकवता ते ज्ञान मलाही शिकवा ना!' मी म्हटले 'तू रोजच गाडीत मारामारी-बाचाबाची करून येतोस. तुला शिकवून काय फायदा? म्हणजे तो सरकारी दहा रुपये भरण्याइतके सामान असेल तरीही पैसे न भरताच आणायचा आणि लोकांना वीस रुपयांचे चहापाणी पाजायचा! लोक खुश व्हायचे. म्हणजे दहा रुपये वाचत तर नाहीत, उलट दहा रुपये जास्त खर्च होतात. असा हा नोबल (!) माणूस.

पुन्हा तो मला म्हणाला, 'तुम्ही मला काही तरी ज्ञान शिकवा.' मी म्हटले, 'तू रोज भांडण करून येतोस आणि रोज मला ते ऐकावे लागते.' तेव्हा म्हणाला 'तरी पण काका, मला तुम्ही काही तरी ज्ञान द्या.' मी म्हणालो, 'एक वाक्य मी तुला देतो, जर पाळणार असशील तर.' तेव्हा तो म्हणाला, 'नक्कीच पाळीन.' मी म्हणालो 'कोणाशीही संघर्ष करू नकोस', मग तो म्हणाला, 'संघर्ष म्हणजे काय, दादाजी? मला नीट समजावून सांगा.' मी म्हणालो, 'आपण अगदी सरळ चालत असू, आणि मध्येच खांब आला तर आपण बाजूला सरकायचे की त्या खांबावर आदळायचे?' तेव्हा तो म्हणाला, 'नाही, आदळले तर डोके फुटेल.' मी म्हणालो, 'समोरुन म्हैस येत असेल तर बाजूने जाशील की तिला टक्कर मारून जाशील?' तेव्हा तो म्हणाला, टक्कर मारली तर ती म्हैस मलाच मारेल, म्हणून मी बाजूला व्हायला हवे.' मग मी विचारले 'साप येत असेल तर? मोठा दगड पडलेला असेल तर?' तर तो म्हणाला, 'तेथेही बाजूनेच जावे लागेल'. मी विचारले, 'कोणाला बाजूने जायला पाहिजे?' तेव्हा तो म्हणाला 'मलाच बाजूने जायला पाहिजे.' मग मी विचारले, 'कशासाठी?' तेव्हा तो म्हणाला, 'माझ्या सुखासाठी. मी जर त्यांना आदळलो तर मलाच लागेल.' मी म्हणालो, 'या जगात काही जण दगडासारखे आहेत, काही म्हशीसारखे आहेत, काही गाईसारखे

आहेत, काही माणसांसारखे आहेत, काही सापासारखे आहेत, तर काही खांबासारखे आहेत, सर्व प्रकारची माणसे आहेत. त्या सर्व लोकांशी आता संघर्ष (भांडण, वादविवाद) करू नकोस. असा उपाय कर.'

हे सर्व मी त्याला १९५१ साली समजाविले होते आणि ते पालन करण्यात आजवर तो कमी पडला नाही. त्यानंतर त्याने कधीच कोणाशी संघर्ष केला नाही. एक शेठजी, जे त्याचे काका लागत होते, त्यांच्या हे लक्षात आले होते की हा आता कोणाशीही संघर्ष करीत नाही. म्हणून ते शेठजी मुद्दाम त्याची कळ काढायचे, त्याला सारखे डिवचत राहायचे! त्यांनी कितीही डिवचले तरीही हा दुसऱ्या बाजूने निसटून जायचा. कसेही करून तो भांडण-वादविवाद टाळायचा. १९५१ नंतर त्याने कोणाशीच संघर्ष केला नाही.

## व्यवहारात टाळा संघर्ष असा

जेव्हा आपण गाडीतून उतरतो आणि लगेच हमालाला बोलावतो 'ए... इकडे ये, इकडे ये! तेव्हा तीन-चार हमाल धावत येतात. आपण म्हणतो, 'चल, हे सामान उचल'. त्याने सामान उचलून घेतल्यानंतर स्टेशनातून बाहेर आल्यावर पैशांसाठी आपण कटकट करतो. 'स्टेशन मास्तरला बोलवू का? इतके जास्त पैसे घेतात? 'असे आहे, तसे आहे,' अरे वेड्या, इथे असे करून नाही चालणार. त्याच्याशी वाद घालू नकोस. तो पंचवीस रुपये म्हणत असेल तर आपण त्याला समजावून सांगायचे, 'भाऊ, खरोखर तर दहा रुपयेच होतात, पण तू वीस घे, चल आता.' तो जास्त पैसे घेत आहे, हे आपल्याला माहित आहे पण आपला नाईलाज आहे, म्हणून थोडे कमी-जास्त पैसे देऊन सुद्धा समाधान करावे. तेथे वादविवाद करू नये. नाही तर तो खूप वैतागेल. आधीच तो घरुन चिडून आलेला असतो त्यातच स्टेशनवर आपण त्याच्याशी कटकट केली तर तो तर रेड्यासारखा आहे, लगेच चाकू मारेल तुम्हाला. तेहतीस गुणांनी माणूस झाला, बत्तीस गुणांनी रेडा होतो!

एखादा माणूस भांडायला आला, आणि त्याचे शब्द बॉम्बगोळ्यासारखे निघत असतील, तेव्हा आपण हे लक्षात घ्यायला हवे की संघर्ष टाळायचा आहे. ध्यानी मनी नसताना अचानकच आपल्या मनावर काही परिणाम होऊ लागला, तर आपण लगेच लक्षात घ्यावे की समोरच्या व्यक्तीच्या मनाचा प्रभाव आपल्यावर होत आहे, अशा वेळेस आपण थोडे बाजूला व्हावे. हे सर्व संघर्ष आहेत. हे जसजसे तुम्हाला कळत जाईल तसतसे तुम्ही हे संघर्ष टाळत जाल. संघर्ष टाळल्याने मोक्ष मिळतो!

हे सारे जग संघर्षमयच आहे, स्पंदनस्वरूपी आहे. म्हणून संघर्ष टाळा. संघर्षाने, वादविवादाने हे जग निर्माण झाले आहे. भगवंताने त्यास वैरामुळे निर्माण झाले आहे, असे म्हटले. प्रत्येक माणूस, अरे, प्रत्येक जीव वैर ठेवतो. प्रमाणाबाहेर झाले तर वैर ठेवल्याशिवाय राहत नाही. मग तो साप असो, विंचू असो, सांड असो किंवा रेडा असो. कोणीही असो, ते सर्व वैर ठेवतात. सगळ्यांच्या आत आत्मा आहे. आत्मशक्ती सर्वांमध्ये सारखीच आहे. कारण पुद्‌गलाच्या (शरीरच्या) निर्बलतेमुळे सहन करावे लागते. पण सहन करण्याबरोबर वैर ठेवल्याशिवाय राहत नाही. आणि पुढच्या जन्मी तो त्या वैराचा बदलासुद्धा घेतो!

एखादा माणूस खूप बोलतो, तर त्याच्या वाटेल तशा बोलण्यानेही आपण संघर्ष करता कामा नये, हा धर्म आहे. हो, बोलणे तर कसेही असू शकते. त्याची बोलण्याची पद्धत कशीही असली तरी आपण वाद करावाच असा काही नियम आहे का? ही तर रात्रभर भांडत बसणारी माणसे! आणि आपल्यामुळे समोरच्याला वाईट वाटेल, असे बोलणे हा फार मोठा गुन्हा आहे. उलट दुसरे कोणी असे बोलले असेल तरीही ती गोष्ट आपण झाकून ठेवावी, त्याला म्हणतात माणूस!

## सहन करू नका, सोल्युशन शोधा

**प्रश्नकर्ता :** दादाजी, संघर्ष टाळावे असे जे आपण म्हणता, याचा अर्थ 'सहन करावे' असाच ना?

**दादाश्री :** संघर्ष टाळा याचा अर्थ सहन करणे असे नाही. सहन कराल तर किती कराल? सहन करणे आणि 'स्प्रिंग' दाबणे, हे दोन्ही सारखेच आहे. 'स्प्रिंग' दाबलेल्या स्थितीत किती दिवस राहू शकेल?' म्हणून सहन करायला तर शिकूच नका. सोल्युशन (उपाय) करायला शिका. अज्ञानदशेत तर सहनच करावे लागते. पण मग एक दिवस स्प्रिंग उसळली तर सर्व उध्वस्त करून टाकते. हा निसर्गाचा नियमच आहे.

जगात दुसऱ्यांमुळे आपल्याला सहन करावे लागेल, असा नियमच नाही. दुसऱ्यांच्या निमित्ताने जे काही सहन करावे लागते तो तर आपलाच हिशोब आहे. परंतु आपल्याला हे कळत नाही की, हा कोणत्या खात्यातला आणि कुठला माल आहे, त्यामुळे आपल्याला असे वाटते की तो नवा मालच देत आहे. नवा माल कोणी देतच नाही. आपण दिलेलाच परत येतो. आपल्या ज्ञानात सहन करण्याचे नसतेच. आपण येथे ज्ञानाचा उपयोग करावा की समोरचा 'शुद्धात्मा' आहे. हे जे काही समोर आले, ते माझ्याच कर्माच्या उदयामुळे आले आहे. समोरचा तर केवळ निमित्तच आहे. हे 'ज्ञान' आपसूकच हे कोडे आपल्याला सोडवून देते.

**प्रश्नकर्ता :** ह्याचा अर्थ असा झाला की मनाचे समाधान करून घ्यायचे की जो माल दिला होता, तोच आता परत आला, असेच ना?

**दादाश्री :** तो स्वतः शुद्धात्मा आहे, आणि ही त्याची प्रकृती आहे, आणि प्रकृती फळ देत आहे. तुम्ही शुद्धात्मा आहात, तो पण शुद्धात्मा आहे. दोघेही समोरासमोर हिशोब पूर्ण करत आहेत. प्रकृतीच्या कर्मांच्या उदयामुळे तो काही देत आहे. म्हणूनच मी म्हणालो की हा तुमच्याच कर्मांचा उदय आहे, आणि समोरचा तर निमित्तच आहे. तो देऊन गेला म्हणजे तुमचा हिशोब पूर्ण झाला. असे उपाय केले, तर मग सहन करण्याचे राहिलेच नाही ना?

जर असे स्पष्टीकरण केले नाही व सहन करीत राहिलो तर काय

होईल बरे? एक दिवस ती स्प्रिंग उसळेल. अशी उसळलेली स्प्रिंग तुम्ही पाहिली आहे का? माझी स्प्रिंग तर फारच उसळत असे. बरेच दिवस मी खूप सहन करत राहायचो आणि मग एक दिवस ती स्प्रिंग उसळायची व सारे उडवून लावतो. असे सर्व अज्ञान अवस्थेत होत असे. मला त्याची आठवण आहे. माझ्या लक्षात आहे. म्हणून तर मी सांगतो की सहन करायला शिकू नका. अज्ञान दशेत सारे सहन करावे लागते. आपल्याला येथे स्पष्ट समजून घ्यायला हवे की ह्याचा परिणाम काय? ह्याचे कारण काय? सर्व हिशोब व्यवस्थित पाहून घ्यावेत. कोणतीही वस्तू हिशोबाबाहेरची नसते.

## संघर्ष, आपल्याच चुकीमुळे

ह्या जगात कोणाशीही संघर्ष होतो, ती तुमचीच चूक आहे, समोरच्याची चूक नाही. समोरचा तर धडकणार आहेच. 'तुम्ही का बरे धडकलात?' तर तुम्ही म्हणाल, 'समोरचा धडकला म्हणून.' म्हणजेच तुम्हीही आंधळे आणि तोही आंधळा.

**प्रश्नकर्ता :** संघर्षात संघर्ष केला तर काय होते?

**दादाश्री :** डोके फुटेल! तेव्हा जर संघर्ष झाला तर आपण काय समजावे?

**प्रश्नकर्ता :** आपलीच चूक आहे.

**दादाश्री :** हो, आणि ती लगेच स्वीकारावी. वाद झाला तर आपण समजावे की 'असे कसे मी बोलून गेलो की ज्यामुळे हे भांडण झाले!' स्वत:ची चूक समजली की समाधान होईल. नंतर पझल सॉल्व होईल (कोडे सुटेल). नाही तर जोपर्यंत आपण 'समोरच्याची चूक आहे' असे शोधत राहू तोपर्यंत हे पझल सॉल्व होणारच नाही. 'आपली चूक आहे' याचा आपण स्वीकार करू तेव्हाच ह्या संसारातून सुटका होईल, दुसरा कोणताही उपाय नाही. दुसरे सर्व उपाय गुंता वाढविणारे

आहेत. आणि उपाय करणे हा आपल्यात दडलेला अहंकारच आहे. उपाय कशासाठी शोधता? समोरच्याने आपली चूक काढली तर आपण असे सांगावे की 'मी तर पहिल्यापासूनच वाकडा आहे.'

बुद्धीमुळे संसारात भांडणे होत असतात. अहो, बायकोचे ऐकून वागलो तरी पतन होते, वादविवाद होतात, मग ही तर बुद्धीबाई! तिचे ऐकाल तर कुठल्या कुठे फेकले जाल. अरे, रात्री दोन वाजता उठून ही बुद्धीबाई काही वेगळेच दाखविते. बायको तर काही काळ बरोबर असते. परंतु बुद्धी तर निरंतर सोबतच असते. ही बुद्धी तर डिथ्रोन (पदभ्रष्ट) करणारी आहे.

जर तुम्हाला मोक्षालाच जायचे असेल, तर बुद्धीचे अजिबात ऐकू नका. बुद्धी तर अशी आहे की ती ज्ञानी पुरुषांचे सुद्धा उलटे (दोष) दाखविते. अरे, ज्यांच्यामुळे तुम्हाला मोक्ष प्राप्त होऊ शकतो, त्यांचेच दोष पाहता? अशाने तर मोक्ष तुमच्यापासून अनंत अवतारांसाठी लांबला जाईल.

संघर्ष, हीच आपली अज्ञानता आहे. कोणाशीही वादविवाद झाला, तर ती आपल्या अज्ञानतेची निशाणी! खरे-खोटे परमेश्वर पाहत नाही. परमेश्वर तर हेच पाहत असतो की, 'तो वाटेल ते बोलला पण वादविवाद तर झाला नाही ना?' 'तर म्हणतो नाही.' बस, आम्हाला एवढेच पाहिजे. अर्थात परमेश्वराकडे खरे-खोटे असे काही नसतेच. हे सर्व तर या लोकांकडे असते. परमेश्वराकडे द्वंद्व नसते ना!

## आपटतात, त्या सर्व भिंती

भिंतीवर आपटलो तर ती भिंतीची चूक की आपली चूक? भिंतीजवळ आपण न्याय मागतो का? भिंतीला आपण सांगतो का, की 'तू येथून बाजूला हो, बाजूला हो!' आणि जर आपण म्हणालो की, 'नाही, मी तर इथूनच जाणार आहे.' तर कोणाचे डोके फुटेल?

**प्रश्नकर्ता :** आपलेच.

**दादाश्री :** तर मग कोणी सावध राहिले पाहिजे? त्यात भिंतीला काय करायचे आहे? यात दोष कोणाचा? ज्याला लागले त्याचा दोष. म्हणजे भिंतीसारखे हे जग आहे.

भिंतीवर आपटलो तर भिंतीबरोबर मतभेद होतात का? कधी तरी भिंतीवर किंवा दरवाज्यावर तुम्ही आपटलात तर त्यावेळेस दरवाज्याशी किंवा भिंतीशी मतभेद होतात का?

**प्रश्नकर्ता :** पण दरवाजा तर निर्जीव आहे ना?

**दादाश्री :** म्हणजे सजीवाबद्दलच तुम्ही असे मानता की तो मला आपटला. ह्या जगात जिथे कुठे आदळ-आपट होते त्या सर्व निर्जीव वस्तूच असतात. ज्या आपटतात ते जिवंत नसतात, सजीव आपटत नाहीत, निर्जीव वस्तूच आपटतात. तेव्हा समोरच्याला भिंत समजूनच व्यवहार करावा, म्हणजे विसंवाद होणार नाही. आणि मग थोड्यावेळाने म्हणायचे 'चला, आपण चहा घेऊया.'

समजा आता एका मुलाने दगड मारला आणि तुम्हाला रक्त आले. तेव्हा त्या मुलाला काय कराल? तर रागवाल. आणि तुम्ही जात असताना डोंगरावरून जर एखादा दगड पडला, तो तुम्हाला लागला आणि रक्त आले तर तुम्ही काय कराल? तुम्ही रागवाल? नाही. याचे काय कारण? तर तो दगड डोंगरावरून पडला आहे! त्या मुलाला तर नंतर पश्चातापही होत असेल, की हे माझ्या हातून असे कसे घडले?

म्हणून ह्या जगाला समजून घ्या. माझ्याकडे आलात तर तुम्हाला चिंता होणार नाही असे करून देईन. आणि संसारात चांगल्या रीतीने राहा. पत्नीसोबत खुशाल फिरायला जा! मुला-मुलींची लग्न अगदी निवांतपणे करा. तेव्हा मग तुमची पत्नी खुश होऊन जाईल. ती म्हणेल 'किती शहाणे बनवून टाकले माझ्या नवऱ्याला!'

आता पत्नीचे शेजारच्या बाईसोबत भांडण झाले असेल, त्यामुळे ती खूप संतापली असेल, आणि त्याच वेळेस तुम्ही बाहेरून घरी आलात. तेव्हा जर रागाच्या भरात ती काही बोलली तर तुम्ही काय कराल? तुम्हीसुद्धा चिडाल का? अशी परिस्थिती जेव्हा निर्माण होते तेव्हा आपण एडजस्ट होऊन वागले पाहिजे. आज ती कुठल्या परिस्थितीमुळे संतापली आहे? कोणाबरोबर भांडली आहे? हे आपल्याला कसे समजणार? आपण पुरुष आहोत, आपण मतभेद होऊ द्यायचे नाहीत. तिने मतभेद केले तरी लगेच त्याचे समाधान करावे. मतभेद म्हणजेच संघर्ष!

## सायन्स, समजून घेण्यासारखे

**प्रश्नकर्ता :** आपल्याला भांडायचे नसेल परंतु एखादी व्यक्ती समोरून भांडायला लागली तर काय करावे?

**दादाश्री :** जर ह्या भिंतीबरोबर भांडलात तर किती वेळ भांडू शकाल? ह्या भिंतीवर जर कधी डोके आपटले, तर आपण तिच्यासोबत काय करावे? डोके आपटले म्हणजेच भिंतीबरोबर भांडण झाले, म्हणून काय आपण भिंतीला मारायचे? तसेच हे जे खूप क्लेश देतात, त्या सर्व भिंतीच आहेत! यात समोरच्याचे काय बघायचे? आपण स्वतःच समजून घ्यायचे की ते भिंतीसारखेच आहेत. मग काही प्रश्नच उरत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण जर मौन राहिलो तर समोरच्या व्यक्तीचा गैरसमज होईल की हा बोलत नाही म्हणजे 'ह्याचाच दोष आहे,' असे समजून तो जास्त क्लेश करतो.

**दादाश्री :** हे तर आपण असे मानतो की मी मौन राहिलो, म्हणून असे झाले. परंतु रात्री एखादा माणूस उठला व बाथरूममध्ये जाताना अंधारात तो भिंतीवर आपटला, तर तेथे आपण मौन राहिलो म्हणून काय ती आपटली?

मौन राहा किंवा बोला, त्याने काही फरक पडत नाही, त्याचा काही संबंधच नाही. आपण मौन राहिल्याने समोरच्या व्यक्तीवर परिणाम होतो असे काही नाही आणि आपल्या बोलण्याने परिणाम होतो, असेही नाही. ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् (केवळ वैज्ञानिक संयोगिक पुरावे, म्हणजेच 'व्यवस्थित शक्ती') आहे. कोणाजवळही इतकी सत्ताच नाही, पूर्णपणे सत्ताविहीन आहे हे जग, ह्यात कोण काय करू शकतो? ह्या भिंतीजवळ जर सत्ता असती, तर त्याच्याजवळ पण सत्ता असती! ह्या भिंतीला ओरडण्याची सत्ता आपल्याला आहे का? तसेच त्या समोरच्या व्यक्तीसाठीही आहे. आणि त्याच्या निमित्ताने जे संघर्ष होणार आहेत, ते तर होणारच. तर मग विनाकारण आरडाओरड करण्यात काय अर्थ? त्याच्या हातात सत्ताच नाही! त्यामुळे तुम्ही भिंतीसारखे होऊन जा ना! तुम्ही बायकोवर सारखे खेकसत राहिलात तर तिच्या आत पण परमेश्वर बसलेला आहे, तो नोंद करेल की हा माझ्यावर खेकसतो. आणि ती जेव्हा तुमच्यावर खेकसत असेल तेव्हा तुम्ही त्या भिंतीसारखे होऊन जा, तर त्यावेळी तुमच्यात बसलेला परमेश्वर तुम्हाला मदत करेल.

तात्पर्य, जर आपली चूक असेल तरच भिंत आपटते. त्यात त्या भिंतीची चूक नाही. तेव्हा लोक मला विचारतात, 'ही सर्व माणसे काय भिंती आहेत? तेव्हा मी म्हणतो 'हो, लोकसुद्धा भिंतीच आहेत.' हे मी पाहून बोलत आहे, ह्या काही थापा नाहीत.

एखाद्याबरोबर मतभेद होणे आणि भिंतीवर आपटणे, ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. ह्या दोन्हीत फरक नाही. भिंतीवर आपटतो, ते त्याला न दिसल्यामुळे आपटतो, आणि मतभेद होतो तेसुद्धा न दिसल्यामुळेच होतो. पुढचे त्याला दिसत नाही. तिथे त्याला उपाय सुचत नाही, त्यामुळे मतभेद निर्माण होतात. हे क्रोध-मान-माया-लोभ वगैरे जे करतात, ते न दिसल्यामुळेच करतात! तर ही गोष्ट समजून घ्यायला

हवी ना! ज्याला लागले त्याचा दोष! भिंतीचा त्यात काय दोष? ह्या जगात सर्व भिंतीच आहेत. भिंतीवर आपटतो तेव्हा आपण तिच्याशी खरे-खोटे करायला जात नाही ना? 'हे माझे खरे आहे' असे ठरवायच्या भानगडीत आपण पडत नाही ना? असे हेही सर्व भिंतीसारखेच आहेत. त्यांचाशी खरे-खोटे करण्याची काही आवश्यकताच नाही.

जे आदळतात त्या सर्व भिंतीच आहेत, असे आपण समजून घ्यावे आणि मग दरवाजा कुठे आहे तो शोधाल तर अंधारातही दरवाजा सापडेल. असे हात चाचपडत, चाचपडत गेलात, तर दरवाजा सापडेल की नाही? आणि मग तिथून आपण बाहेर सटकायचे. संघर्ष करू नये. असा नियम पाळला पाहिजे की मला कोणाच्याही संघर्षात (वादविवादात) पडायचे नाही.

## असे जीवन जगावे

इथे तर लोकांना जीवन जगताच येत नाही. लग्न करताही येत नव्हते. महामुश्किलीने लग्न झाले! बाप होता येत नाही, तरी पण बाप झाला. आता तरी मुले खुश होतील असे जीवन जगायला हवे. सकाळी सगळ्यांनी ठरवून टाकले पाहिजे की, 'आज आपण एकमेकांशी संघर्ष-वादविवाद होणार नाही असे वागूया.' संघर्षामुळे काही फायदा होत असेल तर मला दाखवा. काही फायदा होतो का?

**प्रश्नकर्ता :** दु:ख होते.

**दादाश्री :** दु:ख होते एवढेच नाही, तर ही भांडणे, वादविवाद यामुळे आता तर दु:ख होतेच, पण संपूर्ण दिवसही बिघडतो. आणि शिवाय पुढील जन्मात मनुष्यत्व पण राहत नाही. मनुष्यत्व कधी राहील, तर जेव्हा सज्जनता असेल तेव्हाच मनुष्यत्व राहील. परंतु जर पशुता असेल, ठोसे मारत राहील, शिंगे मारत राहील, तर काय पुन्हा तेथे मनुष्यत्व येईल का? गाई-म्हशी शिंगे मारतात की माणूस मारतो?

**प्रश्नकर्ता :** माणूस जास्त मारतो.

**दादाश्री :** माणूस मारतो तर त्याला जनावराची गती मिळेल, मग तिथे दोन पायाऐवजी चार पाय मिळतील आणि शिवाय शेपूट फुकट! तिथे काही असे-तसे आहे? तिथे दु:ख नाही का? भयंकर दु:ख आहे. जरा समजून घ्यायला हवे, असे कसे चालेल?

## संघर्ष, वादविवाद ही आपलीच अज्ञानता

**प्रश्नकर्ता :** जीवनात स्वभाव जुळत नाहीत, त्यामुळे संघर्ष होतात ना?

**दादाश्री :** संघर्ष होतात, त्यालाच म्हणतात संसार.

**प्रश्नकर्ता :** विसंवाद होण्याचे कारण काय?

**दादाश्री :** अज्ञानता. जोपर्यंत कोणासोबतही मतभेद होतात, ती तुमच्याच कमतरतेची निशाणी आहे. लोक चुकीचे नाहीत. मतभेदामध्ये चूक तुमचीच आहे. लोकांची चूक नसतेच. कोणी जाणून-बुजून करीत असेल, तरी पण आपण तिथे माफी मागून घ्यावी की, 'भाऊ, मला हे समजत नाही.' तसे पाहिले तर लोक चुका करतच नाहीत, लोक मतभेद करतील असे नसतातच. जेथे संघर्ष होतो तेथे आपलीच चूक आहे.

**प्रश्नकर्ता :** संघर्ष टाळायचा असेल आणि जर मध्येच खांब उभा असेल तर आपण सरळ बाजूला सरकून जावे, हे बरोबर. परंतु तो खांबच आपल्यावर पडला तर आपण काय करावे?

**दादाश्री :** पडला, तर आपण सरकून जायचे.

**प्रश्नकर्ता :** आपण कितीही बाजूला झालो, तरी तो खांब आपल्याला लागल्याशिवाय राहणार नाही. उदाहरणार्थ आपली पत्नी संघर्ष करते.

**दादाश्री :** संघर्ष होतो त्यावेळेस आपण काय करायला हवे, ते शोधून काढायचे.

**प्रश्नकर्ता :** समोरची व्यक्ती आपला अपमान करते आणि आपल्याला अपमान झाला असे वाटते, तर त्याचे कारण आपला अहंकार आहे का?

**दादाश्री :** वास्तवात समोरचा जो आपला अपमान करीत आहे, तो तर आपला अहंकार वितळवून टाकत आहे आणि तेही नाटकीय अहंकार. जेवढा एक्सेस अहंकार असतो तेवढा तो वितळवून टाकतो. ह्यात आपले काय बिघडणार आहे? ही आपली कर्मे काही आपल्याला सुटू देत नाहीत. आपण तर, लहान मूल जरी समोर असेल तरी त्याला सांगावे की 'बाबा रे, आमची सुटका कर आता!'

## सामावून घ्या सर्व, समुद्रासम पोटात

**प्रश्नकर्ता :** दादाजी, व्यवहारात व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) वेगळा असल्यामुळे मोठा लहानांची चूक काढतो, लहान त्याच्यापेक्षाही लहानांची चूक काढतो, असे का?

**दादाश्री :** हे तर असे आहे की मोठा लहानांना खाऊन टाकतो, मोठा लहानांची चूक काढतो. त्यापेक्षा आपण म्हणावे की माझीच चूक आहे. चूक स्वीकारली तर त्या गोष्टीचे निवारण होते. 'आम्ही' काय करतो? दुसरा कोणी जर सहन करू शकत नसेल तर आम्ही ती चूक आमच्या डोक्यावर घेतो, दुसऱ्यांच्या चुका काढत नाही. आपण दुसऱ्यांना दोष का द्यावा? आपल्याजवळ तर सागराएवढे पोट आहे! पाहा ना, मुंबईतील साऱ्या गटारीचे पाणी सागर सामावून घेतो ना? त्याचप्रमाणे आपणही पिऊन टाकावे (सामावून घ्यावे). त्यामुळे काय होईल की, ह्या मुलांवर आणि सर्व लोकांवर त्याचा प्रभाव पडेल. तेही शिकतील. मुलेसुद्धा समजून जातील की ह्यांचे सागराएवढे पोट आहे! जेवढे येईल,

तेवढे जमा करून घ्या. व्यवहारात असा नियम आहे की, अपमान करणारा स्वत:ची शक्ती आपल्याला देऊन जातो. म्हणून अपमान हसतमुखाने स्वीकारावेत!

## 'न्यायस्वरूप', तेथे हिशोब आपलाच

**प्रश्नकर्ता :** संघर्ष टाळण्याची, 'समभावाने निकाल' करण्याची आपली वृत्ती असेल, तरी पण समोरील व्यक्ती आपल्याला त्रास देत असेल, अपमान करत असेल, तर आपण काय करावे?

**दादाश्री :** काहीच नाही. तो आपला हिशोब आहे, आणि त्याचा 'समभावाने निकाल' करायचा आहे, असा निश्चय आपण आपल्या निश्चयातच राहायचे आणि आपले कोडे आपणच सॉल्व करीत राहायचे.

**प्रश्नकर्ता :** हे संघर्ष होतात ते 'व्यवस्थित शक्तीच्या' आधाराने होत असतील ना?

**दादाश्री :** हो. संघर्ष आहे, तो 'व्यवस्थित शक्ती'(सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एवीडन्स)च्या आधाराने होत आहे, हे खरे, परंतु असे केव्हा म्हणता येईल? तर संघर्ष होऊन गेल्यानंतर. 'वादविवाद करायचाच नाही' असा आपला निश्चय असावा. समोर खांब दिसला, म्हणजे आपल्याला समजते की पुढे खांब आहे, म्हणून वळू जावे लागेल, आपटायचे तर नाहीच. तरीसुद्धा आपटलो गेलो तर आपण म्हणायचे की 'व्यवस्थित आहे.' पहिल्यापासूनच 'व्यवस्थित आहे,' असे समजून पुढे चालू लागलो, तर त्या 'व्यवस्थित'च्या ज्ञानाचा दुरुपयोग झाला असे म्हणावे लागेल.

## घर्षणाने शक्ती कमी होते

सर्व आत्मशक्ती जर कधी संपत असेल तर ती घर्षणाने. संघर्षाने झाला तरी संपेल! समोरचा येऊन भीडला तरी पण आपण मात्र संयमपूर्वक राहिले पाहिजे! संघर्ष तर व्हायलाच नको. मग हा देह जायचा असेल

तर जावो, परंतु कुठल्याही परिस्थितीत संघर्ष व्हायला नकोच. केवळ एक हा संघर्ष नसेल, तर मनुष्य मोक्षाला जाईल. जर कुणी इतकेच शिकला असेल की, 'मला संघर्षात पडायचेच नाही,' तर मग अशा माणसाला गुरुची किंवा अन्य कोणाचीही आवश्यकता नाही. एक-दोन जन्मातच तो सरळ मोक्षाला जाईल. 'घर्षणात यायचेच नाही' अशी श्रद्धा जर त्याच्यात निर्माण झाली आणि त्याने तसे ठाम ठरविले, तेव्हापासूनच त्याला समकित झाले! (समकित-शुद्धात्म्याचे लक्ष्य असलेली सम्यक् दृष्टी) म्हणजे जर कोणाला समकित प्राप्त करायचे असेल तर आम्ही गॅरंटी देतो की घर्षण करायचेच नाही असा निश्चय करा, तेव्हापासून समकित होईल! देहाने संघर्ष केला आणि घाव पडले, तर मलमपट्टी केल्याने बरे होतील. परंतु घर्षण आणि संघर्षणाने मनावर जे डाग पडले असतील, बुद्धीवर डाग पडले असतील, त्यास कोण काढणार? हजार जन्म घेऊन सुद्धा हे डाग जाणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** घर्षण आणि संघर्षाने मन-बुद्धी वर घाव पडतात का?

**दादाश्री :** अरे! फक्त मनावर, आणि बुद्धीवरच नाही, संपूर्ण अंत:करणावर घाव पडत राहतात आणि त्याचा परिणाम शरीरावरही होतो! घर्षणामुळे तर कितीतरी अडचणी निर्माण होतात.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सांगता की घर्षणाने सर्व शक्ती संपून जाते. तर जागृतीमुळे ती शक्ती परत मिळवता येईल का?

**दादाश्री :** शक्ती मिळविण्याची आवश्यकता नाही, शक्ती तर आहेच. ती शक्ती आता उत्पन्न होत आहे. पूर्वी जे घर्षण झाले होते, आणि जो तोटा झाला होता, तोच आता भरपाई होत आहे. परंतु आता जर नवीन संघर्ष उभे केले तर मात्र शक्ती निघून जाईल, आलेली शक्ती पण निघून जाईल आणि जर आपण संघर्ष होऊच दिले नाहीत, तर शक्ती उत्पन्न होत राहील!

ह्या संसारात वैरभावाने घर्षण होते. संसाराचे मूळ बीज वैर आहे, ज्याचे वैर आणि घर्षण बंद झाले, त्याचा मोक्ष झाला! प्रेम नडत नाही, वैर संपले तर प्रेम उत्पन्न होते.

## कॉमनसेन्स, एवरीव्हेर एप्लिकेबल

व्यवहार शुद्ध होण्यासाठी काय हवे? 'कॉमनसेन्स' कम्प्लीट (संपूर्ण व्यावहारिक समज) पाहिजे. स्थिरता-गंभीरता असायला हवी. व्यवहारात कॉमनसेन्सची गरज आहे. 'कॉमनसेन्स' म्हणजे 'एवरीव्हेर एप्लिकेबल' (सर्वत्र उपयोगी). स्वरूपज्ञानासोबत 'कॉमनसेन्स' असेल तर अति उत्तम.

**प्रश्नकर्ता :** 'कॉमनसेन्स' कसा प्रकट होतो?

**दादाश्री :** जरी कोणी आपल्याशी संघर्ष केला तरी आपण कोणाशी संघर्ष करू नये. अशा प्रकारे राहिलो तर कॉमनसेन्स उत्पन्न होतो. आपण मात्र कोणासोबतही संघर्ष करायला नको, नाही तर कॉमनसेन्स निघून जाईल! आपल्याकडून संघर्ष व्हायला नको.

समोरच्या माणसाच्या संघर्षाने आपल्यात 'कॉमनसेन्स' उत्पन्न होतो. आत्म्याची शक्ती अशी आहे की, संघर्षाच्या वेळेला कसे वागावे, ह्याचे सर्व उपाय दाखवून देते, आणि एकदा दाखविल्यानंतर ते ज्ञान जात नाही. असे करता, करता 'कॉमनसेन्स' वाढत जातो. माझा कोणाशी संघर्ष होणार नाही, कारण माझा 'कॉमनसेन्स' जबरदस्त आहे. त्यामुळे तुम्ही काय सांगू इच्छिता हे तात्काळ माझ्या लक्षात येते. लोकांना असे वाटते की हे सर्व दादांचे अहित करीत आहेत, परंतु मला लगेच कळते की हे अहित, अहित नाही. सांसारिक अहित नाही आणि धार्मिक अहित पण नाही आणि आत्म्यासंबंधित अहित तर नाहीच नाही. लोकांना असे वाटेल की आत्म्याचे अहित करीत आहेत, परंतु आम्हाला त्यात हित दिसते. म्हणजे हा आहे 'कॉमनसेन्स'चा प्रभाव. म्हणून आम्ही 'कॉमनसेन्स'चा अर्थ लिहिला आहे की 'एवरीव्हेर एप्लिकेबल' हल्लीच्या

पिढीत 'कॉमनसेन्स' सारखी वस्तूच नाही. जनरेशन टू जनरेशन (पिढी दर पिढी) 'कॉमनसेन्स' कमी होत चालला आहे.

आपले (आत्म) विज्ञान प्राप्त झाल्यानंतर माणूस अशा प्रकारे राहू शकतो. किंवा सामान्य जनतेत एखादा माणूस अशा प्रकारे राहू शकतो, असे पुण्यवान लोकसुद्धा असतात! पण ते ठराविक बाबतीतच असे राहू शकतात, सर्व बाबतीत असे राहू शकत नाहीत!

**प्रश्नकर्ता :** सर्व घर्षणांचे कारण हेच आहे ना की एका 'लेयर' (पातळी)हून दुसऱ्या 'लेयर'चे अंतर खूप जास्त आहे?

**दादाश्री :** घर्षण ही तर एक प्रकारची प्रगती आहे! जेवढी डोकेफोड होईल, घर्षण होईल, तेवढाच उंचीवर जाण्याचा मार्ग मिळतो. घर्षण झाले नाही तर तुम्ही तिथल्या तिथेच राहाल. म्हणून लोक घर्षण शोधत असतात.

## घर्षणाने प्रगतीच्या मार्गावर...

**प्रश्नकर्ता :** घर्षण प्रगतीसाठी आहे असे समजून जर घर्षण शोधले तर प्रगती होईल?

**दादाश्री :** पण ते तसे समजून घर्षण शोधत नाहीत! भगवंत काही उंचीवर घेऊन जात नसतात, घर्षणच उंचीवर घेऊन जाते. घर्षण काही ठराविक हद्दीपर्यंतच उंचीवर घेऊन जाऊ शकते. नंतर मात्र ज्ञानी भेटले तरच काम होईल. घर्षण तर नैसर्गिक रीत्या होत असते. जसे नदीत दगड आपसात आपटून-आपटून गोल होतात तसे.

**प्रश्नकर्ता :** घर्षण आणि संघर्षण यात फरक काय?

**दादाश्री :** ज्यांच्यात जीव नाही अशा वस्तू जेव्हा एकमेकांवर आपटतात, त्यास घर्षण म्हणतात आणि ज्यांच्यात जीव आहे ते जेव्हा एकमेकांवर आपटतात तेव्हा संघर्ष होतो.

**प्रश्नकर्ता :** संघर्षाने आत्मशक्ती कोंडली जाते ना?

**दादाश्री :** हो, खरी गोष्ट आहे. संघर्ष झाला तर हरकत नाही, पण 'मला संघर्ष करायचा आहे', असा भाव मात्र काढून टाकावा, असे मी सांगत आहे. 'आपला' संघर्ष करण्याचा भाव नसावा, मग 'चंदुलाल'ने (वाचकांनी येथे स्वत:चे नाव समजावे) संघर्ष केला तरी हरकत नाही. आत्मशक्ती कोंडली जाईल, असे आपले भाव नसावेत.

## घर्षण करविते, प्रकृती

**प्रश्नकर्ता :** घर्षण कोण करवितो? जड का चेतन?

**दादाश्री :** पूर्वीची घर्षणेच पुन्हा घर्षणे करवीत आहेत। जड किंवा चेतन यांचा ह्यात प्रश्नच नाही. आत्मा ह्यात हस्तक्षेप करीतच नाही. हे सारे घर्षण पुद्‌गलच (शरीरात असलेला आत्म्याशिवायचा भाग जो पूरण होत असतो आणि गलन होत असतो, उदा. मन-बुद्धी-चित्त-अहंकार, कषाय इ.) करवीत असते. पण जी जी पूर्वीची घर्षणे आहेत, तीच पुन्हा घर्षण करवीत आहेत. ज्यांचे पूर्वीचे घर्षण संपून गेले त्यांना पुन्हा घर्षण होत नाही. नाही तर घर्षणावर घर्षण, आणि त्याच्यावर पुन्हा घर्षण, असे वाढतच जाते.

पुद्‌गल म्हणजे काय, तर ते पूर्णत: जड नाही पण मिश्रचेतन आहे. ह्याला विभाविक पुद्‌गल म्हटले आहे. विभाविक म्हणजे विशेषभावाने परिणाम पावलेले पुद्‌गल, तेच हे सारे करवीत आहे! जे शुद्ध पुद्‌गल आहे, ते पुद्‌गल असे काही करत नाही. हे पुद्‌गल तर मिश्रचेतन झालेले आहे. आत्म्याचा विशेषभाव आणि जडाचा विशेषभाव, दोन्ही एकत्र होऊन तिसरे रूप तयार झाले, प्रकृतीस्वरूप झाले. तेच हे सारे घर्षण करवीत असते!

**प्रश्नकर्ता :** घर्षण होत नाही, यास खरा अहिंसकभाव उत्पन्न झाला असे म्हणता येईल?

**दादाश्री :** नाही, तसे काही नाही! पण हे दादांकडून समजले की, ह्या भिंतीसोबत घर्षण केल्याने एवढा फायदा( !), तर परमेश्वरासोबत घर्षण करण्यात केवढा फायदा? ही जोखीम समजल्यानेच आपले परिवर्तन होत राहते.

अहिंसा पूर्णपणे समजेल अशी नाही, पूर्णपणे समजणे खूप कठीण आहे. त्यापेक्षा एवढे जरी पकडले असेल की 'घर्षणात कधीच पडू नये.' तर मग काय होते, ती शक्ती टिकून राहते आणि दिवसेंदिवस शक्ती वाढतच जाते. मग घर्षणामुळे होणारे नुकसान होत नाही! कधी घर्षण झालेच तर घर्षणानंतर आपण प्रतिक्रमण केले तर ते पुसले जाते. तेव्हा हे समजून घ्यायला हवे की ह्या बाबतीत घर्षण होत आहे म्हणून त्याचे प्रतिक्रमण करायला हवे. नाही तर खूप मोठी जबाबदारी आहे. या ज्ञानामुळे मोक्षाला तर जाल, परंतु घर्षणामुळे मोक्षाला जाताना खूप अडचणी येतात आणि वेळही बराच लागतो.

ह्या भिंतीसाठी उलट-सुलट विचार आले तर हरकत नाही, कारण ते एकतर्फी नुकसान आहे. परंतु जिवंत लोकांसाठी एक जरी वाईट विचार आला तर मात्र जोखीम आहे. दोन्हीपक्षी नुकसान होते. परंतु नंतर आपण जर त्याचे प्रतिक्रमण केले तर ते सर्व दोष निघून जातात. म्हणून जिथे-जिथे घर्षणे होत आहेत, तिथे तिथे प्रतिक्रमण करा, म्हणजे घर्षणे संपून जातील.

## समाधान, सम्यक् ज्ञानानेच

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ही अहंकाराची गोष्ट घरातही बऱ्याच वेळा लागू पडते, संस्थेत लागू पडते, दादाजींचे काम करीत असतानाही अहंकारामुळे संघर्ष होत असतो, तिथेही लागू पडते. तिथे सुद्धा समाधान पाहिजे ना?

**दादाश्री :** हो समाधान पाहिजे ना! आपल्या इथे 'ज्ञान' घेतलेला

माणूस समाधान मिळवील. पण ज्याला 'ज्ञान' नाही तो कसे समाधान मिळवील? तेथे मग दरी निर्माण होते, त्याच्यापासून मन वेगळे होत जाते. आपल्या इथे वेगळे पडणार नाही!

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, संघर्ष करायला नको ना?

**दादाश्री :** संघर्ष होतो, हा तर स्वभाव आहे. असा 'माल' (कर्म) भरून आणला आहे, म्हणून असे घडते. जर असा माल आणला नसता तर असे झाले नसते, म्हणून आपण समजून घ्यावे की ह्या भाऊची अशी सवयच आहे. मग आपल्यावर त्याचा काहीच परिणाम होणार नाही. कारण सवय, सवयवाल्याची (पूर्वसंचित संस्कार असलेल्या जीवाची), आणि 'आपण' आपले (शुद्धात्मा)! आणि मग त्या गोष्टीचा निराकारण होऊन जातो. तुम्ही अडकून राहिलात तरच अडचण! बाकी, संघर्ष तर होणारच. संघर्ष होणार नाही, असे घडतच नाही. त्या संघर्षामुळे आपण एकमेकांपासून दुरावणार नाही ह्याची मात्र दक्षता घ्यावी. संघर्ष तर पति-पत्नीमध्ये सुद्धा होतो, पण तरी ते पुन्हा एकजुटीने राहतात ना? असे तर चालायचेच. म्हणून आम्ही कोणावरही दडपण आणले नाही की 'तुम्ही संघर्षात पडूच नका.'

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, संघर्ष होऊ नये असा भाव सतत ठेवला पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, भाव ठेवला पाहिजे. हेच तर करायचे आहे ना! त्याचे प्रतिक्रमण करायचे आणि त्यासाठी भाव ठेवायचा! पुन्हा तसे झाले तर पुन्हा प्रतिक्रमण करायचे, कारण एक थर निघून जातो, मग दुसरा थर निघून जातो. असे थर आहेत ना! माझे जेव्हा संघर्ष होत होते, तेव्हा मी नोंद करत होतो, की आज तर चांगले ज्ञान मिळाले! संघर्षामुळे अजागृती राहत नाही. सदैव जागृती राहते ना! ते आत्म्याचे विटामिन आहे. अर्थात ह्या संघर्षात काहीच अडचण नाही. संघर्षानंतर एकमेकाशी

वेगळे व्हायचे नाही, हाच इथे पुरुषार्थ आहे. समोरच्यासाठी जर आपले मन वेगळे होत असेल, तर प्रतिक्रमण करून सर्व सुरळीत करावे. आम्ही ह्या सर्वांबरोबर कसे मिळून-जुळून राहतो? तुमच्यासोबतही आमचे जुळते की नाही जुळत? असे आहे, की शब्दांमुळे संघर्ष उभा होतो. मला तर खूप बोलावे लागते, पण तरीसुद्धा संघर्ष होत नाही ना?

संघर्ष तर होणारच. ही भांडी एकमेकांवर आपटतात की नाही? आपटणे(संघर्ष करणे) हा पुद्‌गलाचा स्वभाव आहे. पण तसा 'माल' भरलेला असेल, तरच. भरलेला नसेल तर नाही. पूर्वी आम्हालाही संघर्ष होत असे. पण ज्ञान झाल्यानंतर मात्र संघर्ष झाला नाही. कारण आमचे ज्ञान अनुभवज्ञान आहे आणि आम्ही ह्या ज्ञानाने सर्व निकाल करून आलेलो आहोत, आणि तुम्हाला निकाल करायचे बाकी आहे.

## दोष धुतले जातात, प्रतिक्रमणाने

कोणासोबतही संघर्ष झाला म्हणजे मग स्वत:चे दोष दिसायला लागतात आणि संघर्ष झालाच नाही, तर दोष झाकलेले राहतात. जेव्हा रोजचे स्वत:चे पाचशे,पाचशे दोष दिसू लागतील तेव्हा समजावे की आता पूर्णाहुती जवळ येत आहे.

तात्पर्य, कसेही करून संघर्ष टाळा. संघर्ष केल्याने इथला हा मनुष्य जन्म तर बिघडतोच परंतु पुढचा जन्मसुद्धा बिघडतो! जो हा जन्म बिघडवतो तो परलोकसुद्धा बिघडवल्याशिवाय राहत नाही! ज्याचा हा जन्म सुधारतो, त्याचा परलोक सुधारतो. ह्या जन्मी जर आपल्याला कोणत्याही प्रकारची अडचण आली नाही, तर समजावे की परलोकात सुद्धा अडचण येणार नाही. आणि येथे जर अडचण उभी केली, तर ती सर्व तेथेही येणारच आहे.

## तीन जन्मांची गॅरंटी

ज्याला संघर्ष, वादविवाद होत नाहीत, त्याचा तीन जन्मानंतर मोक्ष

होईल, ह्याची मी गॅरंटी देतो. संघर्ष झाला तर प्रतिक्रमण करून घ्यावे. संघर्ष पुद्‌गलाचा आहे आणि पुद्‌गलाचा पुद्‌गलाशी झालेला संघर्ष हा प्रतिक्रमणाने नष्ट होतो.

समोरचा भागाकार करत असेल तर आपण गुणाकार करावा, म्हणजे रक्कम उडून जाईल. समोरच्या व्यक्तीसाठी, 'त्यानी मला असे म्हटले, तसे म्हटले.' असा विचार करणे, हाच गुन्हा आहे. रस्त्याने जाताना झाडावर आपटलो तर आपण त्या झाडाबरोबर का भांडत नाही? झाडाला जड कसे म्हणायचे? आपटतात ती सर्व झाडेच आहेत! गाईचा पाय आपल्यावर पडला, तर आपण काही म्हणतो का? तसेच ह्या सर्व लोकांचे आहे. 'ज्ञानी पुरुष' या सर्वांना कशाप्रकारे माफ करतात? ते जाणतात की ह्या बिचाऱ्यांना समजत नाही, झाडासारखे आहेत. आणि ज्यांना समजते त्यांना तर सांगावे लागतच नाही, ते तर लगेच प्रतिक्रमण करतात.

## जेथे आसक्ती तेथे 'रिॲक्शन'च

**प्रश्नकर्ता :** परंतु बऱ्याचदा आपल्याला द्वेष करायचा नसतो तरीसुद्धा द्वेष होऊन जातो. याचे कारण काय?

**दादाश्री :** कोणासोबत?

**प्रश्नकर्ता :** कधी नवऱ्यासोबत असे घडले तर?

**दादाश्री :** त्यास द्वेष म्हणत नाही. आसक्तीचे जे प्रेम असते, ते नेहमीच रिएक्शनरी असते. म्हणजे जेव्हा चिडतात तेव्हा तिरसटपणे वागतात. मग थोडे दिवस एकमेकांपासून लांब राहतात, म्हणजे मग पुन्हा प्रेम वाढते, प्रेम वाढले की पुन्हा भांडण होते, मग पुन्हा प्रेम वाढते. जिथे अत्याधिक प्रेम असते तिथे विसंवाद होतो. म्हणजेच जिथे विसंवाद होत असेल तिथे त्या लोकांमध्ये आतून प्रेम असते. प्रेम असेल तरच विसंवाद होतो. पूर्व जन्मीचे प्रेम आहे, तर विसंवादही असणारच.

अत्याधिक प्रेम आहे, नाही तर विसंवाद करणारच नाहीत ना? या विसंवादाचे स्वरूपच असे आहे.

त्यास मग लोक काय म्हणतात? 'या विसंवादामुळेच तर आमचे प्रेम आहे.' तेव्हा ही गोष्टही खरी आहे. ही आसक्ती विसंवादामुळेच झालेली आहे. जिथे संघर्ष कमी असेल तिथे आसक्ती नसते. ज्या घरात स्त्री-पुरुषात संघर्ष कमी असेल तिथे आसक्ती कमी आहे असे आपण समजावे. समजता येईल अशी गोष्ट आहे ना?

**प्रश्नकर्ता :** संसार व्यवहारात जो अहम् असतो त्यामुळे खूप ठिणग्या उडतात.

**दादाश्री :** त्या अहम्च्या ठिणग्या नाहीत. दिसतात अहम्च्या ठिणग्या, पण त्या असतात विषयविकाराच्या आधीनतेमुळे. विषयविकार नसेल तर हेही नसेल. विषयविकार बंद झाल्यानंतर हा इतिहास पण बंद होईल. म्हणजे ज्यांनी वर्षभरासाठी ब्रह्मचर्यव्रताचे पालन केले आहे, त्यांना मी विचारतो, तेव्हा ते म्हणतात, 'आता जीवनात काहीच तक्रार नाही, कटकट नाही, खटपट नाही, काहीच नाही, स्टॅन्ड स्टील (सर्व शांत)!' मला माहित आहे की ब्रह्मचर्यव्रत घेतल्यानंतर असेच होत असते. म्हणून मी त्यांना मुद्दाम विचारतो. म्हणजे ते विषयभोगाच्या कारणाने होत असते.

**प्रश्नकर्ता :** पूर्वी आम्ही असेच समजत होतो की घरातील कामकाजाबद्दल संघर्ष होत असेल, म्हणून कामात मदत करायला लागलो, पण तरीही संघर्ष होतोच.

**दादाश्री :** हे सगळे संघर्ष-विसंवाद होणारच. जोपर्यंत ह्या विकारी गोष्टी आहेत, संबंध आहेत, तोपर्यंत संघर्ष होणारच. संघर्षाचे मूळ कारण विषयविकारच आहे. ज्याने विषयविकार जिंकला, त्याला कोणी हरवू शकत नाही. कोणी त्याचे नाव पण घेणार नाही. त्याचा प्रभाव पडतो.

## संघर्ष, स्थूलापासून ते सूक्ष्मतमपर्यंतचे

**प्रश्नकर्ता :** आपले वाक्य आहे की, 'संघर्ष टाळा.' 'ह्या वाक्याची आराधना करीत राहिलात, तर थेट मोक्षाला पोहोचाल. ह्यात स्थूल संघर्ष टाळणे, मग हळूहळू, पुढे जात-जात सूक्ष्म संघर्ष, सूक्ष्मतर संघर्ष टाळणे.' हे सर्व समजावून सांगा ना.

**दादाश्री :** त्याला आतून सुचत जाते. जसजशा पुढे जाईल, तसेतसे आपोआप त्याला समजायला लागेल, कोणी शिकवायला नको. आपोआप सर्व जमते. हे सूत्रच असे आहे की ते थेट मोक्षाला घेऊन जाते.

दुसरे सूत्र 'भोगतो त्याची चूक' हे सूत्र पण मोक्षाला घेऊन जाईल. हे एक-एक शब्द मोक्षापर्यंत घेऊन जाईल. याची गॅरंटी आमची.

**प्रश्नकर्ता :** ही जी सापाची आणि खांबाची उदाहरणे दिलीत. ती तर स्थूल संघर्षाची उदाहरणे आहेत. पण आता सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम ह्यांची उदाहरणे पण द्या. सूक्ष्म संघर्ष कसा असतो, हे सांगा.

**दादाश्री :** तुझ्या वडिलांसोबत तुझे जे होते, तो सर्व सूक्ष्म संघर्ष आहे.

**प्रश्नकर्ता :** सूक्ष्म म्हणजे मानसिक? वाणीने होतात, ते पण सूक्ष्मात धरले जातात?

**दादाश्री :** वाणीने होतात ते सर्व स्थूल. पण जे समोरच्याला कळत नाही, जे दिसत नाही, असे सर्व सूक्ष्मात जाते.

**प्रश्नकर्ता :** हे सूक्ष्म संघर्ष टाळायचे कसे?

**दादाश्री :** आधी स्थूल, नंतर सूक्ष्म, नंतर सूक्ष्मतर आणि नंतर सूक्ष्मतम संघर्ष टाळायचे.

**प्रश्नकर्ता :** सूक्ष्मतर संघर्ष कशास म्हणतात?

**दादाश्री :** तू एखाद्याला मारत असशील, त्यावेळी तो ज्ञानदृष्टीने पाहतो की 'मी शुद्धात्मा आहे, आणि ही 'व्यवस्थित शक्ती' मारत आहे' असे सर्व पाहतो, पण मनात थोड़ासा तुझा दोषही पाहतो, तर हा झाला सूक्ष्मतर संघर्ष.

**प्रश्नकर्ता :** पुन्हा सांगा, नीट समजले नाही.

**दादाश्री :** हे जे तू सगळ्यांचे दोष पाहतोस, ना! तो सूक्ष्मतर संघर्ष आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दुसऱ्यांचे दोष पाहणे, हा सूक्ष्मतर संघर्ष आहे?

**दादाश्री :** असे नाही, स्वतः ठरवलेले असते की दुसऱ्यांचे दोष नाहीतच आणि तरी पण दोष दिसतात, तो सूक्ष्मतर संघर्ष आहे. कारण तो समोरचा शुद्धात्मा आहे आणि दोष वेगळा आहे.

**प्रश्नकर्ता :** तर त्यालाच मानसिक संघर्ष म्हणतात का?

**दादाश्री :** मानसिक तर सर्व सूक्ष्मामध्ये गेले.

**प्रश्नकर्ता :** तर ह्या दोन्हीमध्ये नेमका फरक काय आहे?

**दादाश्री :** ह्या तर मनाच्याही पलीकडच्या गोष्टी आहेत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हा सूक्ष्मतर संघर्ष आहे, त्याक्षणी सूक्ष्म संघर्ष पण सोबत असतो ना?

**दादाश्री :** ते आपण पाहायचे नाही! सूक्ष्म वेगळे आहे आणि सूक्ष्मतर वेगळे आहे. सूक्ष्मतम म्हणजे अगदी शेवटची गोष्ट.

**प्रश्नकर्ता :** एकदा सत्संगात अशी गोष्ट निघाली होती की चंदुलालशी तन्मयाकार होणे, याला सूक्ष्मतर संघर्ष म्हटले जाते.

**दादाश्री :** होय. सूक्ष्मतर संघर्ष! ते टाळावे. चुकून तन्मायाकार झालात, पण मग लक्षात येते ना की ही चूक झाली?

**प्रश्नकर्ता :** तर तो संघर्ष टाळण्याचा उपाय फक्त प्रतिक्रमण हा एकच आहे, की दुसरा कोणता आहे?

**दादाश्री :** दुसरे कोणतेही हत्यार नाही. ही आपली नऊ कलमे, ती सुद्धा प्रतिक्रमणच आहेत. अन्य कोणते हत्यार नाही. ह्या जगात प्रतिक्रमणाशिवाय दुसरे कोणतेही साधन नाही. प्रतिक्रमण हे सर्वोत्कृष्ट साधन आहे. कारण हा संसार अतिक्रमणामुळे उभा राहिला आहे.

**प्रश्नकर्ता :** हे तर खूपच आश्चर्यकारक आहे. 'जे घडले तोच न्याय', 'भोगतो त्याची चूक' ही जी वाक्ये आहेत, ती सगळी अद्‌भूत वाक्ये आहेत. आणि दादांच्या साक्षीने आपण प्रतिक्रमण करतो ना, त्यामुळे त्याची स्पंदने पोहचतातच.

**दादाश्री :** हो, खरे आहे. स्पंदन लगेचच पोहोचतात आणि त्याचा परिणामही होतो. आपल्याला खात्री होते की ह्याचा परिणाम होताना दिसत आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, प्रतिक्रमणे तर एवढ्या झपाट्याने होतात, अगदी त्याच क्षणी! हे तर आश्चर्यच आहे, दादाजी!! ही दादाजींची कृपा अगाध आहे.

**दादाश्री :** हो. हे आश्चर्यच आहे, हे सर्व सायंटिफिक आहे.

**-जय सच्चिदानंद**

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3

# हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229


**www.dadabhagwan.org**



## संघर्ष टाळा

आपण रस्त्याने काळजीपूर्वक चालत असतो, तरीही समोरच्या व्यक्तीने जर आपल्याला धडक मारली आणि आपले नुकसान झाले तर ती गोष्ट वेगळी. पण आपला हेतू कुणाचे नुकसान करण्याचा नसावा. जर आपण त्याचे नुकसान करायला गेलो तर त्यात आपलेच नुकसान होणार आहे. संघर्षात नेहमीच दोघांचेही नुकसान होते. तुम्ही समोरच्या व्यक्तीला दु:ख दिले, तर तुम्हालाही - ऑन द मोमेंट - तत्क्षणी तसेच दु:ख झाल्याशिवाय राहत नाही. हाच संघर्ष आहे.

म्हणून मी उदाहरण दिले की रस्त्यावरील वाहतूकीचा धर्म ( नियम ) काय आहे की धडक माराल तर तुमचे मरण ओढावेल. धडक मारण्यात खूप धोका आहे, म्हणून कोणालाही धडक मारू नका. त्याच प्रकारे प्रापंचिक संबंधात सुद्धा संघर्ष करू नका. संघर्ष टाळा!

\- दादाश्री

dadabhagwan.org

ISBN 978-93-86289-91-9
9 789386 289919
Printed in India
Price ₹10